**अचानक नाहीशा झालेल्या व ठावठिकाणा माहित नसलेल्या शासकीय कर्मचारी / निवृत्तीवेतनधारक यांच्या कुटुंबियांना कुटुंबनिवृत्तीवेतन मंजूर करणेबाबत ... मृत घोषित श्री रमेश माधवराव कापकर, सेवा निवृत्त पोलीस शिपाई.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : कुनिवे-०७१५/प्र.क्र.३८/आस्था-१**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १७ एप्रिल, २०१५.

वाचा :-१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : सेनिवे-१०३९/४९१/सेवा-४, दि. ५.७.१९९१.

२) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/३९/४२ /संकीर्ण/०१/२०१४, दि. २२.०१.२०१५.

३) पोलीस आयुक्त, नागपूर शहर यांचे कार्यालयाचे पत्र क्र.पोआना/पेन्शन/सेवानिवृत्त लापता/ कापकर/कान्ताबाई/२०१४/१५५३, दि. १६.१०.२०१४.

**प्रस्तावना :**

श्री. रमेश माधवराव कापकर, पोलीस शिपाई हे पोलीस आयुक्त, नागपूर शहर यांचे आस्थापनेवर कार्यरत होते. ते दि. ११.१०.१९७७ रोजी स्वेच्छा सेवानिवृत्त झाले आहेत. ते दि. १२.०७.२००५ रोजी नातेवाईकांचे लग्नाचे निमित्ताने नागपूर येथे गेले. त्यानंतर ते परत आले नाहीत. श्री. रमेश माधवराव कापकर, पोलीस शिपाई बेपत्ता झाल्याची खबर पोलीस स्टेशन आरमोरी, तालुका आरमोरी जिल्हा गडचिरोली येथे मिसिंग रजिस्टर नंबर ९/०५ वर नोंद आहे.

२. श्रीमती कांताबाई रमेश कापकर यांनी दिवाणी न्यायाधीश ( कनिष्ठ स्तर), आरमोरी येथे, श्री. रमेश माधवराव कापकर ७ वर्षापेक्षा जास्त कालावधीपासून बेपत्ता असल्यामुळे, त्यांना मृत घोषित करणे न्यायोचित ठरेल, असा दिवाणी दावा क्र. १४/२०१३, दि. १९.०९.२०१३ रोजी दाखल केला. श्री. रमेश माधवराव कापकर हे दि. १२.०५.२००५ रोजी बेपत्ता झाल्याने मा. दिवाणी न्यायाधिश (कनिष्ठ स्तर), आरमोरी, जिल्हा गडचिरोली यांनी दि. १७.०२.२०१४ च्या न्यायानिर्णयाद्वारे त्यांना मृत घोषित केल्याने त्यांची पत्नी श्रीमती कांताबाई रमेश कापकर यांना कुटुंब निवृत्तीवेतन मंजूर करण्याबाबतचा प्रस्ताव पोलीस आयुक्त, नागपूर यांनी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांच्या मार्फत शासनास सादर केला आहे.

**शासन निर्णय :**

मा. दिवाणी न्यायाधीश (कनिष्ठ स्तर), आरमोरी, जिल्हा गडचिरोली यांनी दि.१७.०२.२०१४ रोजी श्री. रमेश माधवराव कापकर यांना मृत घोषित केले असल्याने त्यांच्या पत्नी श्रीमती कांताबाई रमेश कापकर यांना कुटुंब निवृत्तीवेतन प्रदान करण्यास शासन मंजूरी देत आहे. तथापि, वित्त विभाग,

क्रमांक सेनिवे-१०८९/४९१/सेवा-४, दि. ५.७.१९९१ अन्वये क्षतिपूर्ती बंधपत्र परिपूर्ण करुन व आवश्यक बाबींची पूर्तता करुन घेण्याची खबरदारी पोलीस आयुक्त, नागपूर शहर यांनी घ्यावी.

सदर शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक सेनिवे-१०८९/४९१/सेवा-४, दि. ५.७.१९९१, वित्त विभाग, क्रमांक सेनिवे-१०८९/४९१/सेवा-४, दि. ७.१०.१९९३, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक सेनिवे-१०९४/१५६/सेवा-४, दि.२६.०६.१९९५, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक सेनिवे-१०००/प्र.क्र. ८३/सेवा-४, दि. ३.०७.२००० ला अनुसरुन उक्त शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४१७१७३३५९०८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Yuvraj Bayaji Ajetrao

Digitally signed by Yuvraj Bayaji Ajetrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Yuvraj Bayaji Ajetrao
Date: 2015.04.17 17:47:35 +05'30'

**( युवराज अजेटराव )**
अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. पोलीस आयुक्त, नागपूर शहर.
३. मृत घोषित रमेश माधवराव कापकर यांचे पत्नीस पोलीस आयुक्त, नागपूर शहर यांचे कार्यालयामार्फत.
४. महालेखापाल ( लेखा व हकदारी), महाराष्ट्र,१/२, मुंबई/नागपूर.
५. कोषागार अधिकारी, नागपूर.
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, नागपूर.
७. निवड नस्ती (आस्था-१)